# अंकुर अक्षरांचे........

## भाग पहिला.



मनातल्या भावनांना अंकुर फुटावेत.....

अन त्या अंकुरांची अक्षरं उमटावीत.....

मराठी कविता

साहित्य प्रतिष्ठान

**ई-पुस्तकाचे नाव: अंकुर अक्षरांचे. (भाग पहिला)**

**संकल्पना: "मराठी कविता" संचालक.**

**रसग्रहण: रंजन कंधारकर**

**मांडणी आणि सजावट: संहिता हिस्वनकर.**

**प्रकाशक: ई-साहित्य प्रतिष्ठान**

आभार.

"मराठी कविता" ने आयोजित केलेल्या "अक्षर-अंकुर महोत्सव २०१२" ला आलेल्या उदंड प्रतिसादाबद्दल सर्व सहभागी कवी-कवयित्रींचे हार्दिक आभार. अंकुर अक्षरांचे ही पुस्तक मालिका त्यातीलच निवडक कवितांची बनली आहे.



ई-साहित्य प्रतिष्ठान.

# रसग्राहिकेचा परिचय:

रंजन कंधारकर यांची खरी ओळख म्हणजे कविताच. त्यांच्या स्वतंत्र शैलीतील कवितांना आजवर अनेक चाहते लाभले आहेत. त्यांच्या अनेक कविता आजवर विविध वृत्तपत्रे, दिवाळीअंक तसेच नियतकालिकांमधून प्रकाशित झालेल्या आहेत. त्यांचा "स्वधा" हा काव्यसंग्रह प्रकाशीत झाला असून त्याला महाराष्ट्र राज्य शासनाच्या "बहिणाबाई चौधरी" पुरस्कारासहित तब्बल २१ पुरस्कार प्राप्त आहेत.

कविवर्य लक्ष्मीकांत तांबोळी यांच्या "गोकुळवाटा" या काव्यसंग्रहातिल कवितांच्या अभिवाचनात त्यांचा सहभाग असतो. याशिवायही महाराष्ट्र व गोमांतकात अनेक ठिकाणी त्यांचे काव्यवाचनाचे कार्यक्रम होतात. 'आनंदयात्रा' या बा.भ. बोरकरांच्या व 'रसयात्रा' या कुसुमाग्रजांच्या काव्यवाचन समारंभात त्या सहभागी असतात.

आकाशवाणीवरील कविसंमेलने, पथनाट्य वाचन, मुलाखत इत्यादी कार्यक्रमांत त्या सहभागी होतात. याशिवाय शालेय-महाविद्यालयीन कथा व काव्यलेखन स्पर्धांमध्ये अनेक वेळा त्या परिक्षक म्हणून काम पाहतात.

रंजनताई सध्या 'मधुगंध' काव्यमंडळाच्या कोषाध्यक्षा तसेच 'अक्षरसूक्त' काव्यमंडळाच्या सचिव म्हणून पदभार सांभाळतात. आपल्या शब्दांतून आणि मार्गदर्शनातून त्यांची साहित्यसेवा अविरत सुरू असते. त्यांचा "भूर्जपत्र" हा आगामी काव्यसंग्रह लवकरच आपल्याला पहायला मिळेल.

# रसग्राहिकेचे मनोगत:

अंकुर अक्षरांचे मालिकेतील अक्षरांचे धनी असलेल्या सर्वांचं अभिनंदन !!
~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

अंकुरणं हा सृष्टीचा नियम आहे.

मग ते पानापानांचं अंकुरणं असो वा मनामनाच!

पानाचं अंकुरण जमिनीशी नातं ठेऊन असतं तर मनाचं भावनेशी !!

असे फुटावे अंकुर अक्षरांचे या मालिकेत आपल्याच मस्तीत उगवतांना दिसतात. काही कोवळे, काही गार हिरवे, काही परिपक्व तर काही सुकलेलेही. कवितेच्या रुपात येणारे हे अंकुर एकंदरीतच मनाला हिरवं करून जातात. यातली काही ठिकाणं तर केवळ पाचूची आहेत. सती , रुद्रविणा , पाउलवाट , माफीनामा , एकरूप , बिंदू , जन्म कवितेचा , मन , वसंत ऋतू अशी काही नावं नमुन्या दाखल देता येतील .

या ठिकाणी मन रमलं नाही तरच नवल .

काही नाजूक वेलींना मात्र अजुन जराश्या आधाराची गरज वाटते . भारंभार वाढलेली शब्दांची पानं ह्या वेलींना उपजत जड करतात . आणि मग हिरवाईचा तोल गेलेला दिसतो . नीटस , नेमकी शब्दरचना ; रचना करता करता पूर्ण कवितेलाच दिलेला सुबक आकार , त्याच त्या अर्थाची *कडवी* करुन बांडगुळ निर्माण करण्याचा
~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~~

टाळलेला मोह या अगदी छोट्या छोट्या गोष्टी कवितेला उंची देण्याच काम करतात . जसं पिवळी पान , सुकलेल्या फांद्या , शिळी फुलं , आजू बाजूला वाढलेलं तण ह्या गोष्टी काढून टाकल्या की झाड अधिकच मोह घालतं, बस, तसंच !

अंकुर अक्षरांचे मालिकेतील या कविता रूपातील अंकुरांचा हा महोत्सव मनापासून मनापर्यंत सेतू बांधण्याचे काम मन:पूर्वक करत आलेला दिसतो . अंकुरण्याची त्यांची धून विलक्षण आहे . ही धून , धुनी सारखी चिरकाल तेवत राहो . ही सदिच्छा !!

संबंधित सर्वांचे आभार !

रंजन ..... आतून !!

अक्षर-अंकुर महोत्सव

# कविवर्य फ. मु. शिंदे सरांचे अक्षर अंकुर महोत्सवाला लाभलेले आशीर्वाद

महोत्सव हा नवा मोहिनीचाच शब्द आहे. अक्षरात अंकुरणारं आकाश असेल तर महोत्सव चंद्र पावतो. कवींचं आकाश चंद्राचं. कवींचं आणि पुन्हा पुनवेचंही. म्हणून महोत्सव आकाश आणि मातीच्या पुनवेचा चंद्रोत्सवही असतो. 'अक्षर अंकुर महोत्सव २०१२' या उपक्रमात त्याची क्रमिकताही आहेच. मुख्य म्हणजे महोत्सवातही उत्कटता.

'अंकुर अक्षरांचे' ही पुस्तक मालिका त्याची म्हणजे महोत्सवाची ई-अभिव्यक्ती आहे. 'ई' हा 'अ'चा प्रत्यय आहे की 'आई'त 'आकाश' आणि 'ईश्वर' या शब्दांचेही अर्थ पावते. मराठी कविता संचालक मंडळाने अक्षरास अंकुरित करण्याचा आत्मविश्वास देणे हेच मालिकेचं मोल आहे!

फ. मु. शिंदे

# गर्भाळल्या शशिला¤

*गर्भाळल्या शशिला...*

*टिचभर चांदणीचे डोहाळे लागले तेव्हाच*

*आभाळ, नक्षत्रांनी आजुबाजूला गिल्ला करत*

*पोटुशा चांदव्याला बांगडी भरली..*

*कोर कोर दिवस जात होते*

*त्या डौलाकडे बघून,*

*आभाळ मायेने बोट मोडायचा.. गडगड*

*अखेर जीव पणाला लावुन*

*चांदव्यानं सुढाळपण रितं केलं..*

*“दर्या झालाय, दर्या!!!!”*

*आभाळानं बोट परत गडगडवलं*

*“दर पंधरवड्याला धाप लागते म्हणे -शशि°ला,*

*नाळ कापा दुर ठेवा दर्याला”*

*कुणितरी टिमटिमलं¤..*

*काऽऽड्कन वीज घुमली*

*नाळ तुटली¤.!*

*आभाळ परत गडगडलं*

*(किंवा श्वास शोधणाऱ्या मुलाकडे राहू की*

*धाप धरणाऱ्या आईकडे पाहू यात गडबडलं..)*

*आता -तिकडे° धाप वाढली कि*

*दर्या झेपावतो -वर° जायला*

*आणि तुम्ही आम्ही नुसतंच वाचतो*

*ऐकलं -तिकडच्या° यंत्रानं सांगितलंय*

*इथे पाणी सापडलंय पाणी¤..!*

*आणि तुम्ही आम्ही नुसतंच म्हणतो¤*

*“आज डोईवर दर्या माजलाय दर्या¤*

*तिथे भरती आलीय भरती¤!!”*

*प्राजक्त देशमुख.*

deshmukh.praj@gmail.com

# प्रेमाची वाहती गंगा

प्रेमाची वाहती गंगा
तू अशीच उधळत जा रे
बदल्यात सारे प्रेम
काळजात साठवीत जा रे

का द्वेष कुणाचा करतो
अन उगा आत तळमळतो
तो तुझाच त्रागा तुझे
काहूर जागवत असतो

हा जन्म एकदा मिळतो
तू सार्थक त्याचे करावे
जे होईल तव हाताने
ते भलेच म्हणता यावे

तू जीवास जीव लावावे
अन माणुसकीस स्मरावे
ती जाळ जळकी लंका
तू राम हृदयी जपावे

कल्पी जोशी

j1shubha@gmail.com

# ठिगळ लावतोय आभाळाला

त्या झिजलेल्या रडगाण्यासम
झिजलेला मी..श्वास थांबले तरी...
मन स्थिरावण्याची वाट बघत..
नव्याने उजाडणाया पहाटेचे-
स्वप्न बघत...उभा जन्म सरुन गेला ..
ओळख शोधता शोधतास्वतःची..
तरीहीअजुनही स्वतःस..
न ओळखु शकलेला षंढ मी.
अपेक्षाभंगाचं ओझंआजकाल..
मी कटाक्षाने टाळतो..
भर पावसात..आकंठ भिजून..
मनसोक्त आसवे गाळतो..
जगतो तसाच...गर्दीत हरवुन...
मरेनही तसाच..गर्दीत हरवुन...
निर्जीव चेह..यांच्या ह्या नाटकी दुनी-
असाच..यावर रंग फासुन-चेह..
स्वतःसाठी...दुनीयेसाठी..
त्या फसव्या चेह...यांच्या-
फसव्याच अश्रुंचे व्याज
आता खरचं डोक्यावर नकोय..
माझ्यावर उपकार केल्याची
भावना...कोणाच्याही मनात नकोय..
मला आता काही नकोय...
कोणीही नकोय...
हवीय ती...कदाचित चिरशांतता...शांतता..

निदान काही क्षणांसाठीची...

मग सुरु करायचाय
तो पुन्हा एक प्रवास..
तोही एकट्यानेच...
अगदी शांत होऊन सर्वाथाने
माझी ही कविता..
कदाचित..आजही पुन्हा बोचेल..
उगाच काहीही लिहीतो हा..
असं सहजचं तुम्हाला वाटेल..
आभाळाच्या डोक्यावरचं
ओझं आता मला उतरवायचयं..
त्यासाठी फक्त एकदा
एक नवं ठिगळ शिवायचयं..
आभाळ दाटेल पुन्हा त्याच जुन्या आर्ततेने..
मिलनाच्या जुन्या..विरहाच्या..आठवणींनी..
जगलो तर जगुद्या,
मेलोच तर मरुदया
आभाळ आत्ताच शिवुन झालयं माझं
थोडं..अगदी थोडं पाणी तरी साठुदया..
त्याच पाण्यात मला आकंठ भिजायचयं
नव्या भुमीकेआधी
एकदाह्या जुन्या पात्रात..
मला एक दिवस मनसोक्त जगायचयं

ओंकार तोरसकर

omkar.pt@gmail.com

# धरा म्हणाली सूर्याला..

ग्रहणात चंद्राच्या छायेमागे गेलेल्या..
सुर्याला म्हणाली धरा..

जरी धुसर झाली तुझी छाया..
तरी कमी नाही झाली माझी माया..

उद्या क्षितीजावर नव्या..
उगवेल सुर्य नवा..

जाणुन आहे मीदुनियेची..
उगवत्या सुर्याला नमस्कार करण्याची..

जुनीच आहे रित..

तुझ्या इवल्याशा अपयशाने..
चंद्राच्या छायेमागे जाण्याने..

कमी नाही होणार माझी प्रित..

सुख दु.. खात:
सदैव ओठी असेल..

तुझेच गीत..

तुझ्याच सोबत मला ऐकायचे ..
मला आयुष्याच्या यशअपयशाचे-

संगीत..

यशा मानव बदलतो अपयशात हा
पण मी निभवेन मानव धर्म खरा..

कारण..मी धरा..
म्हणुनच..मी धरा..

फक्त निभाव रोज येण्याची..
..ही रित
..हि प्रित
..हे गीत
..हे संगीत
तुझीच
धरा..

आरती कुलकर्णी

artik243@gmail.com

# बाळ झोपलाय माझा ..........

गेलास एकदम आपटत झपटत
लाथा देऊन अल्लड नटखट

तुला शिकवलं, तुला घडवलं
लाथाडून चिखलाला गणपती बनवलं

थोडीशी आस थोड्याश्या अपेक्षा
चिमुटभर ओझं तुला नाही पेलवलं !!!

मग सांगायचं नाहीस का वेड्या
नसत्या रचल्या मी परीक्षेच्या शिड्या

आज असं तू काय कमावलस
फास घेऊन सर्वस्व गमावलस

बाळा.........
बाळा का असं केलंस ?
लाडक्या आयडीला चर्र्रकण चीरलस

हृदयी आगीचा डोंब उठला
चिमुकल्या हाकांचा काहूर माजला
आई................आई ...आई ...आई ..

बाळा ....
बाळा कुठे आहेस रे तू !!!
बाळा ....

पान्ह्याने सारा झंपर भिजला
अश्रूंचा मात्र दुष्काळ पडला

एकदमच ओठातून शब्द निघाला
......
....
ये पोरांनो ...
..
गप्प बसा....
शूऊऊऊऊऊऊऊऊऊ...
गप्प बसा म्हणते न मी
.
.
बाळ झोपलाय माझा ..........

सुधाकर बर्गे

sudhakar.barge@gmail.com

# मनातल्या इरीतून

उन्हातान्हातून-

कुन्या हातातून

जव्हा घमेलं घेशी

तू तान्या शिरावर

तव्हा भरून येई

डोयांच्या काठावर

खारं पानी

मनातल्या इरीतून

दगडधोंड्यातून-

काट्याकुट्यातून-

जव्हा रगत येई

मऊ पायातून

माय तुझी

इव्हळते आतून

इव्हळने तुझे

पाहून चष्म्यातून

तुटलेल्या हाताने
मोडलेल्या मनातून
देवाऱ्यातल्या दगडाले

मी इनवते वाकून

सारी ओझी मी वाहीन

तुझ्या पोटी जन्म घेऊन

तुझ्या शिरी सावली धरीन

सूर्याले पदराने झाकून



श्रीराज मोरे

shriraj.more@gmail.com

# मन

मनालाही आवरेना, बेभान मनाची ही धाव,
वेगामागे वेडी, कशी मनाची या हाव!

विचारांची राही विणत वेडी साखळी साखळी
खुडूनही टाकी त्यांना जशी नकोशी पाकळी....

कधी बांधून इमले खाली आभाळ ठेउनी,
कधी उरेना त्याकडे, तुकडा मातीचा चौकोनी!

चुका करूनही पळे, त्याच चुकांच्याच पाठी,
सोडी तिथेच त्यांना, बंधूनी अनुभव गाठी!

ओढ अनामिक असताना, क्षणात नकोशीही होई,
नकोशी इच्छाही कधी, आपुली म्हणून घेई!!

कारण जगायचे शोधी, ठेवी उमेदीची आस,
दिसूनही अर्थ जीवनाचा, घेई शेवटचा ध्यास...

घालूनी कुलुपे कितीही, नाही राहत ताब्यात,
कधी, "उडसांगूनही ", राही अडकुनी कुंपणात!

काय हवेसे मनाला, कधी त्यालाच कळेना,
कधी मिळूनही वाटे, काही मनीचे मिळेना!!

कसे उकलावे गूढ, काय करावा इलाज,
स्पर्शूनही तळ, त्याच्या खोलीचा येईना अंदाज

त्रिपुरा रानडे

tripura.ranade@gmail.com

# 'संदेश'

*आकाशाचा संदेश घेउनी,*
*एक चिमुकला पक्षी आला,*
*हातातील माझ्या दाणे टिपता,*
*माझीच ओंजळ पण भरून गेला;*

*आकाशाचा संदेश घेऊनी ,*
*नित्य येतात कित्येक किरण,*
*कुठे बरे लुप्त होतात,*
*उजळून टाकूनी सारे जीवन?*

*मेघही घेऊन येतात,*
*आकाशीचाच संदेश,*
*बदलते रंग रूप त्यांचे,*
*अन बदलणारे गणवेश;*

*बदलत नाही ती गहिराई,*
*संदेशाची ही नवलाई,*
*आनंद ओसंडतो मनात,*
*ऐकता आकाशाची ती अंगाई...*

*अर्चना रानडे.*

ranade.archana@gmail.com

# जन्म कवितेचा

ये नच कविता कधि आमंत्रुन
येते कधि ना करुणा भाकुन
अनुभव, घटना मनास स्पर्शुन
जाती दुखवुन, कधी सुखावुन
विचार काहुर मनात दाटुन
जलदापरि ये मन ओथंबुन
शब्द, भावना संगम होउन
आशय बरसे काव्यघनातुन ......... १

ये नच कविता कधिही कळवुन
दार कुणाचे ना ठोठावुन
मनी जन्मुनी, येई आतुन
कवच मनाचे अवचित भेदुन
भाव मनीचे मनास लंघुन
निर्झरापरी झुळझुळ वाहुन
झर झर झरती ते झरणीतुन
आणि उतरती कविता होउन ...... २

ये नच कविता कधि हातातुन
सृजन तिचे हो मनगाभ्यातुन
विचार दर्या उधाण येउन
भाव उर्मी त्या उठती उसळुन
येति तटी अन् जाती विखरुन
शब्दांची ती रत्ने सांडुन
त्या शब्दांच्या पल्याड जाउन
भाव बोलती कविता होउन ........ ३

......... उल्हास भिडे (१६-७-२०१०)

ulhasbhide@gmail.com

# आस

कुणीतरी म्हणालं,
सांभाळ आता तुझ्या बाबाना
बाई गेल्यावर खचतो माणूस
पाऊलावर पाऊल टाकायचा लागतो ध्यास
काळाच्या पडद्याआड जाण्याची उरते आस
माझं उदास हसु,
मनातला डोंब फूटून
तांडव घालायला लागलेले आसू
दडवले शब्दांच्या मखरात,
म्हटलं,
असं कसं होईल
आमच्यासाठी त्याच्या मायेची पाखर
आणखी काही वर्ष तरी राहिल

ती गेली तेव्हाच मी का नाही गेलो
दचकून पाहिलं बाबाकडे
वाटलं,
घट्ट मारावी मिठी
आई गेली आत्ताच, तू नको जाऊ
शब्दाच्या आजूबाजूला
घुमायला लागलं पारव्यासारखं,
कुणाचंतरी म्हणणं
बाई गेल्यावर खचतो माणूस....

खरचं का रे तसं झालं...
खचलास का रे बाबा तू?
केलास ना पुरा तुझाच ध्यास
ती गेली त्याच वाटेवर टाकलंस पाऊल
लेकींसाठी नाहीच ना अडला पाय

कधीतरी का होईना,
कुणाचंतरी म्हणणं खोटं का नाही ठरलं
आई गेल्यावर, बाबा तुला आमच्यासाठी
रहायला
का नाही जमलं?

मोहना प्रभुदेसाई जोगळेकर
mohana_joglekar@hotmail.com

# पतंग

उडलाउडला नभी उत्तुंग ,
रंगीत चिठोराऐटीत पतंग ,

मौज लुटत आकाशाची
पहात खेळी पक्षीथव्यांची

झुळुकेसंगे गोड डोलतो
नेतो वारा तेथे जातो

गगनी उंच उडला जितुका
एकाकी रे पडला तितुका

साथ सूक्ष्म एका धाग्याची
चाकरी माणूस अन् वारयाची

कर्मभूमी ते अफाट गगन
आल्हाद घेती थोर लहान,

रोख घेई दिमाखात हा
पतंगा दुसरया कापण्या पहा

तुटुनी दोर गेला गेला
ढगांआड अदृष्य जाहला

आभाळाने गिळले त्याते
इहलोकाशी तुटले नाते

सुटला संपर्क भूतलाशी
मुक्कामास अज्ञात आकाशी

भरारीत तो अवघ्या जगला
तयातची का विलिन झाला ?

दृष्टीआड आता तयाचा सुखद रंग ,
हरपुनी गेला एक पतंग .......

नंदकुमार देशपांडे
deshnand@gmail.com

# हे विधात्या

चिरडत चालल्यायत गाड्या

लाल दिव्यांच्या

माणसामागोमाग माणसांना

सारवले जातायत रस्ते

रक्तरंजित रांगोळ्यांनी

हे विधात्या

किती केले जाणार आहेत यज्ञ

धर्माच्या नावाखाली

आणि पडणार आहेत आहुत्या मानवी हाडांच्या

समिधा म्हणून

ओसांडतंय मानवी कारुण्य

असंख्य चेहऱ्यांवरून

तुझ्या अहिंसक पणातीच

न फाटणारं कफन

केव्हा पांघरणार आहेस रे विधात्या

त्यांचा प्रत्येक क्षण

मृत्युचाच ठरताना४..?



विलास गावडे

GAWADE.VILAS@mahindra.com

# गॉडफार्मर

स्वर्गात जाहली चर्चा
आकाश नांगरुन काढा
गाळून थेंब घामाचे
कपाणीपी काहीतरी ओढा

तत्काळ आरंभ करावा
आदेश दिला इंद्राने
हे काम करावे पूर्ण
सूर्यदेव वा चंद्राने

आदेश मिळाल्यावरती
कामास लागला सूर्य
मद्ध्यान्हापर्यंत झाली
नांगरून अख्खी पूर्व

राहिले काम जे अर्धे
त्या झाली संध्याकाळ
हर एक नभाचे ढेकुळ
फोडुनिया केले विरळ

बेण्यावर शिंपून पाणी
भिजण्यास ठेवल्यावरती
सूर्यदेव गेले घरला
घेण्यास जरा विश्रांती

चंद्रदेव इकडुन आले
पाहुनी सूर्य झोपेत
उचलून बियाणे आयते
पेरले मुक्त शेतात



*वायाने जलदां आणले-*
*अन दिधले त्यांनी पाणी*
*पिक तरारून मग उठले*
*भरभरुन पिकलि चांदणी*

*हे सारे होता होता*
*जशी पहाट किणकिणली*
*चांदण्यांनी भरुनि कणगी*
*चंद्राने गाडी हाणली*

*सूर्यदेव उठुनी पाहती*
*गायब सारे झालेले*
*मद्ध्यान्हापर्यंत शोधून*
*ते°आगबबूले° झाले*

*कितीतरी दिवस ते गेले*
*हे असेच चाले थेट*
*सूर्याने कष्ट करावे*
*पिक चंद्रगृहाला भेट*

*प्रद्युम्नसंतु*

**sk120148@gmail.com**

# नच माते करुं कोपा,

नच माते करुं कोपा,

मजवरि धरि अनुकंपा. ll

पोरी तुज बहु असती, परि प्रीती मजवरती,

जाणसि तूं हे चित्ती, मग कां घालिसि भीती?

करिं मी दंगा मस्ती, तरि वाटे तव धास्ती,

प्रेमा तो मजवरिचा, नेउं नको लोपा ...ll

(आईने कान पकडून म्हटले, "मेल्या..", मुलगा म्हणाला थांब, थांब.

अजून गाणे संपले नाही ....)

करपाशीं या तनुला, बांधुनि करिं शिक्षेला,

धरुनीयां कानाला, गुच्चा घे गालाला

परि ना धरिं अबोला, रडुं येइल मग मजला.

शिक्षा ती अति कठोर, होइल मत्पापा, ll

नच माते ....

प्रभाकर फडणीस

**pkphadnis@yahoo.com**

# तुझ्या गोळ्या, माझ्या गोळ्या

(भा.रा. तांबे यांच्या "तुझ्या गळा, माझ्या गळा ह्या कवितेचे विडंबन.)

तुझ्या गोळ्या, माझ्या गोळ्या
विसरू नको साऱ्यांच्या वेळा

तुज कवळी, मज काठी
आणखी चष्मा दोघांना
लपवूया पण श्रवणयंत्राला
नको कळाया कोणाला

सकाळ झाली, सारी पळाली
आपल्या आपल्या कामाला
आपण दोघे जाऊ ग
नानानानी पार्कात हळूहळू चालायला

पाच वाजले, उठ लवकरी
करू तयारी चहाची
कामावरून येईल आता
मुलाची अन् सुनेची स्वारी

हसेल घर, खिदळेल घर
होऊ आपण सामील त्यात
मोडून शिंगे, विसरून मानापमान
खऱ्या सुखाची हीच वाट

राजश्री जोगळेकर
jsrnaus@gmail.com

## प्रकाशकांकडून दोन शब्द:

मराठी माणूस म्हणजे लढवय्या. मराठी माणूस म्हणजे कला रसिक. मराठी माणसाची ही प्रतिमा इतर लोकांत आहे. योग्यच आहे ते. मराठीत जितकं सुंदर लिखाण झालंय तितकं इतर भाषांत अभावानेच आढळतं.

पण तो झाला इतिहास. मराठीतल्या चांगल्या लेखकांची आणि कवींची यादी करायची झाली तर नांवापुढे कै. जास्त. आणि जे आज आहेत ते सत्तरच्या दशकापुर्वी गाजलेले. गेल्या चाळीस वर्षांत पुढे आलेले लेखक कवी किती ? पुस्तकांच्या प्रदर्शनात गेल्यावर कोणाच्या पुस्तकांना मागणी दिसते. नवीन किती लेखक कवींची पुस्तकं प्रकाशित होतात आणि खपतात आणि वाचली जातात?

नवीन लेखक एका दुष्ट चक्रात सापडले आहेत. पुस्तकं खपत नाहीत म्हणून प्रकाशक पुस्तक प्रकाशित करत नाहीत. आणि प्रकाशक प्रकाशात आणतच नाहीत तर या बिचार्यांहची नांवं लोकांपर्यंत जाणार कशी ? आणि लोकांना जर यांचं नांवच माहित नाही तर यांची पुस्तकं खपणार कशी ? आणि पुस्तकं खपत नाहीत तर छापणार कोण ? म्हणजे आलं का संकट ? मग नव्या लेखकांनी लिहावं कसं ? आणि लिहीलं तर त्याचं करावं काय?

याचं उत्तर घेऊन आलं आहे ई साहित्य प्रतिष्ठान. नवीन लेखकांसाठी , ताज्या साहित्यासाठी ई पुस्तकांचं माध्यम घेऊन आम्ही आलो आहोत. तुमचं पुस्तक आम्हाला द्या. ते जाऊ दे लाखो लोकांपर्यंत. लोकांना आवडलं तर लोक दुकानात जाऊनही घेतील. निदान त्या नावाच्या पुस्तकाची चौकशी तर करतील ?

अक्षर अंकुर हा ई साहित्य प्रतिष्ठानचा एक प्रोजेक्ट आहे नवीन टॅलंटचा शोध घेण्यासाठी. पहिल्या राउंडमध्ये आम्ही ७९ नवीन कवींचा शोध घेतला. त्यातले काही फ़ारच चांगले

निघाले. काही शिकाऊ आहेत. लवकरच यांच्या साहित्याचा आस्वाद आमच्या सव्वा लाख वाचकांना घेता येईल.

या नंतरचा आमचा टप्पा असेल गद्य लेखकांचा. कथा , कादंबर्या , लघुनिबंध, बालसाहित्य अशा सर्व प्रकारांतून नवीन टॅलंट शोधत राहू. खाणीतून कोणतं रत्न निघतं पाहू.

वाचकांना एकच विनंती आहे. हिर्यांचा शोध घेताना कोळशाच्या खाणीत उतरावं लागतं. आणि कोळसा कोणता , हिरा कोणता आणि कोहिनूर कोणता हे वाचकच ठरवतील. तेव्हा वाचकांच्या (स्पष्ट) अभिप्रायांची गरज आहे. तसंच ही पुस्तकं तुमच्या मित्र आप्तांपर्यंत जायची गरज आहे. तुम्ही ती फ़ॉरवर्ड करायची आहेत.

बघा . मराठीत जर काही चांगलं निर्माण व्हावं असं वाटत असेल तर तुमचा सक्रिय सहभाग हवा. नाहीतर...

नाहीतर काय ?

काही नाही.

काहीच नाही.

# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षापूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-स्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२

*लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.*

***तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??***

**फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.**

esahity@gmail.com

akshar.ankurmk@gmail.com

*खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.*

***:अधिक माहितीसाठी :***
***संकेत स्थळ***

**www.esahity.com**

फेसबुक

https://www.facebook.com/esahity

http://www.facebook.com/groups/kavya.marathi